"मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" या योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी विविध समित्या गठीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग.**
**शासन निर्णय क्रमांक- मबावि २०२४/प्र.क्र.१६६/कार्या-२,**
नवीन प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरू चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:-१५ जुलै, २०२४.

**संदर्भ:-**१) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि २०२४/प्र.क्र.९६/कार्या-२, दि.२८.०६.२०२४.
२) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्र.मबावि २०२४/प्र.क्र.१६६/कार्या-२, दि.११.०७.२०२४.

**प्रस्तावना :-**

राज्यातील महिलांच्या आर्थिक स्वातंत्र्यासाठी आणि त्यांच्या आरोग्य आणि पोषणात सुधारणा करण्यासाठी आणि कुटुंबातील त्यांची निर्णायक भूमिका मजबूत करण्यासाठी महाराष्ट्र राज्यात "मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" योजना राबविण्याबाबत शासन निर्णय दि.२८.०६.२०२४ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

"मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" या योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीच्या अनुषंगाने शासन निर्णय दि.११.०७.२०२४ अन्वये विविध समित्या गठीत करण्यात आल्या होता. सदर योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीच्या अनुषंगाने सदर शासन निर्णय अधिक्रमित करुन सुधारित विविध सचिव स्तरीय समित्या गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन आहे.

**शासन निर्णय :-**

"मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" या योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीच्या अनुषंगाने संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन खालीलप्रमाणे सुधारित सचिव स्तरीय समित्या गठीत करण्यात येत आहे:-

**अ) <u>लाभार्थी नोंदणी Portal समिती:-</u>**

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव, ऊर्जा विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

१) "मुख्यमंत्री-माझी लाडकी बहीण" या योजनेच्या अपेक्षित लाभार्थ्याची संख्या विचारात घेवून कालबध्द पध्दतीने त्यांच्या नोंदणीसाठी योजनेचे पोर्टल तयार करणे.

२) सदर पोर्टल “Go live” करणे.

३) योजनेच्या पोर्टलच्या वापरासंदर्भात भविष्यात येणाऱ्या अडी-अडचणीचे निराकरण करणे.

**ब) लाभार्थी निश्चिती समिती:-**

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव (नवि -२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | प्रधान सचिव, ग्राम विकास व पंचायत राज विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४ | सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

१) केंद्र/राज्य शासनाच्या विविध योजनांच्या लाभार्थीची (उदा.PM-KISAN, POSHAN, MGNREGS, PM-Svanidhi, JSY, PMMVY व अन्य तत्सम योजना) मुख्यमंत्री माझी लाडकी बहीण योजनेमध्ये नोंदणी करण्यासाठी गाव पातळीवर Unique List उपलब्ध करुण देणे.

२) ज्या महिला राज्य शासनाच्या कोणत्याच योजनेच्या लाभार्थी नाहीत त्यांची नव्याने स्वतंत्रपणे नोंदणी झाल्यानंतर त्यांच्या याद्या तयार करण्याची पध्दत ठरविणे.

३) उपरोक्त प्रमाणे दोन्ही प्रकारे तयार होणाऱ्या याद्यांतील पात्र लाभार्थ्यांना लाभ देण्याकरिताची पध्दती निश्चित करणे.

**क) लाभ अदायगी प्रणाली समिती:-**

| अ.क्र. | पदनाम | समितीमधील पदनाम |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | सचिव, लेखा व कोषागारे, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ३ | संचालक, लेखा आणि कोषागारे | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

१) “मुख्यमंत्री माझी लाडकी बहीण” या योजनेंतर्गत उपरोक्त प्रमाणे पात्र प्रत्येक महिलेला तिच्या आधार लिंक केलेल्या स्वत:च्या सक्षम बँक खात्यात थेट लाभ हस्तांतरण (Direct Benefit Transfer) पध्दतीने सदर योजनेचा लाभ जलद गतीने देण्यासाठी कार्यप्रणाली निश्चित करणे.

२) आवश्यक त्या ठिकाणी संबंधित बँक/पोस्ट पेमेंट बँक, National Payments Corporation of India (NPCI) आदि यंत्रणांशी समन्वय साधून लाभ अदायगीमध्ये सुसूत्रता व गती आणणे.

३) या संदर्भात भविष्यात येणाऱ्या अडी-अडचणीचे निराकरण करणे.

२. उपरोक्त प्रमाणे गठीत तिन्ही समित्या मुख्य सचिव यांना दैनंदिन अहवाल/माहिती सादर करतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०७१५१८५१३६१२३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUJATA MANOJ SAUNIK

Digitally signed by SUJATA MANOJ SAUNIK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=04f6ff0d1ef522f4e19358cfac66e30d146fa47249c32a356455a756d05ec1a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F49173DCDA3F795FF41A69777F5A6C2DED24F621CD434ABBB169565D1ABDAA1F, cn=SUJATA MANOJ SAUNIK
Date: 2024.07.15 19:03:09 +05'30'

**( सुजाता सौनिक )**
**मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष/सदस्य, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई,
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई,
६. मा.मंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
७. सर्व मा.मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
८. मा.मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई,
९. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
११.विभागीय आयुक्त (सर्व),
१२.आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१३.आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे,
१४.जिल्हाधिकारी (सर्व),
१५.महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
१६.महालेखापाल - महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर,
१७.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१९.सह सचिव, उपसचिव, अवर सचिव महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
२०.सर्व सह आयुक्त/उप आयुक्त / विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
२१.सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास (आयुक्तालय पुणे मार्फत),

२२.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (आयुक्तालय पुणे मार्फत),
२३.महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई (सर्व कार्यासने),
२४.निवड नस्ती, कार्यासन-२